क्रीडा विद्यापीठ व क्रीडा अकादमी -
राज्यातील क्रीडापीठ / क्रीडा अकादमी यांना सन २०२१-२२ साठी दैनंदिन देखभाल दुरुस्तीसाठी निधी वितरीत करणेबाबत- लेखाशिर्ष (२२०४-२०६४)

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन निर्णय क्रमांकः क्रीविस-१७२२/प्र.क्र.३६/क्रीयुसे-१,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०२२

वाचा :-

१. शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक- शाशिम-१०९५/ प्र.क्र.१६६/ क्रीयुसे-३, दिनांक १८ नोव्हेंबर, १९९५.
२. शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक- शाशिम-१०९५/ प्र.क्र.१६६/ क्रीयुसे-३, दिनांक २७ मार्च, १९९७.
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १७ मार्च, २०२२.
४. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र: निविप्र/०१/२०२१-२२/(१)/का-११/१०६३, दिनांक २२ फेब्रुवारी, २०२२.

प्रस्तावना :-

राज्यात शारिरीक शिक्षण व क्रीडा यांचा दर्जा उंचविण्यासाठी, क्रीडा विद्यापीठ/क्रीडा ॲकादमीची स्थापन करण्याचा पहिला टप्पा म्हणून पुणे येथील शिवछत्रपती क्रीडानगरी येथे मध्यवर्ती क्रीडा केंद्र व राज्यातील वेगवेगळया १४ ठिकाणी क्रीडा प्रबोधिनी स्थापन करण्यास संदर्भाधिन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. सद्य:स्थितीत राज्यामध्ये ९ क्रीडा प्रबोधिनी कार्यान्वित आहेत. सन २०२०-२१ व सन २०२१-२२ या कालावधीत कोविड-१९ या साथरोगाच्या प्रादुर्भावामुळे क्रीडा प्रबोधिनी/क्रीडा अकादमी बंद होत्या. यापैकी काही प्रबोधिनी माहे सप्टेंबर-२०२१ च्या शेवटच्या आठवडयामध्ये व काही क्रीडा प्रबोधिनी ऑक्टोबरच्या पहिल्या आठवडयामध्ये सुरु झालेल्या आहेत. या क्रीडा प्रबोधिनींना स्वत:च्या उत्पन्नाचे मार्ग नसल्यामुळे शासन देखभाल दुरुस्तीकरीता काही अनुदान दरवर्षी उपलब्ध करुन देते. प्रबोधिनींमध्ये निवासी प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षण देण्यात येत असल्यामुळे त्यांचे भोजन, वैद्यकीय उपचार, स्पर्धा सहभाग, शैक्षणिक खर्च, क्रीडा गणवेश, क्रीडा साहित्य खरेदी, कार्यालयीन कर्मचाऱ्यांचे मानधन व क्रीडा प्रबोधिनीच्या दैनंदिन देखभाल व दुरुस्ती इ.खर्चासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची मागणी संदर्भ क्र.४ अन्वये केली आहे.

उपरोक्त कार्यान्वित सहा क्रीडा विद्यापीठ/क्रीडा ॲकादमींना सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात सप्टेंबर, २०२१ पासून पुढील सात महिन्यांच्या कालावधीसाठी दैनंदिन देखभाल व दुरुस्ती खर्चासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

आर्थिक वर्ष २०२१-२२ साठी मागणी क्रमांक ई-३, मुख्य लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (३३) क्रीडा विद्यापीठ व क्रीडा अकादमी, (३३) (०१) क्रीडा विद्यापीठाची स्थापना (कार्यक्रम), ३१

सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), संगणक क्रमांक २२०४-२०६४ या लेखाशीर्षाखाली अंदाजानुसार खर्चासाठी उपलब्ध रु.१२१२.०० लक्ष तरतूदीमधून रु.२८९.१० लक्ष इतकी तरतूद वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांनी संदर्भ क्र.४ अन्वये केलेल्या निधी मागणी प्रस्तावातील खर्चाच्या बाबींपैकी क्रीडा गणवेश व क्रीडा साहित्य खरेदीसाठी आवश्यक रु.५००.०० तसेच, संगणक, कार्यालयीन व वसतीगृह फर्निचर, भोजनगृहातील भांडी खरेदीसाठी आवश्यक रु.१०.९० लक्ष अशा एकूण रु.५१०.९० लक्ष रक्कमेच्या साहित्य व साधनसामग्री खरेदी संदर्भात उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय, दि.३०.१०.२०१५, दि.०१.१२.२०१६ व दि.०६.०१.२०२० मधील तरतूदीनुसार उचित कार्यवाही करुन यासाठीच्या निधी मागणीचा प्रस्ताव स्वतंत्ररित्या शासनास सादर करण्यात यावा.

३. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी क्रीडा विद्यापीठाची स्थापना (कार्यक्रम) या योजनेंतर्गत लेखाशिर्ष २२०४-२०६४, ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सुधारीत अंदाजानुसार रु.१२१२.०० लक्ष इतकी रक्कम उपलब्ध आहे. उपरोक्त संदर्भ क्र.४ अन्वये प्राप्त झालेल्या रु.८००.०० लक्ष निधी मागणीच्या प्रस्तावातील साहित्य व साधन सामग्री खरेदी या बाबींवरील रु.५१०.९० लक्ष इतकी रक्कम वजा जाता, उर्वरित रु.२८९.१० लक्ष रक्कम खर्चासाठी वितरीत करण्यात येत आहे.

४. उपरोक्त मंजूर निधी मागणी क्रमांक ई-३, मुख्य लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (३३) क्रीडा विद्यापीठ व क्रीडा अकादमी, (३३) (०१) क्रीडा विद्यापीठाची स्थापना (कार्यक्रम), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), संगणक क्रमांक २२०४-२०६४ या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१४४/१४७१, दिनांक २४.०३.२०२२ व वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र. ४१४/२०२२, दिनांक २९.०३.२०२२ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३०१९२९३७०७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2022.03.30 20:30:45 +05'30'

**( स्वा. म. नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल , महाराष्ट्र राज्य.
२. मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
५. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.

५. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
९. सर्व अधिदान व लेखाधिकारी, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१२. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
१३. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१४. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. निवड नस्ती (क्रीयुसे-१).